# शिवाजी महाराजांची 'स्वराज्य' ही संकल्पना काय होती?

E Book 117



नमस्कार मित्रांनो,

शिवाजी महाराजांची 'स्वराज्य' ही संकल्पना काय होती? या शिवाय गमिनीकावा ही शब्दयोजना महाराजांच्या युद्धनितीला समर्पक आहे का? नसेल काय पर्याय असावा? गुरिल्ला हा शब्द महाराजांच्या लढायांच्या संदर्भात गौरवाने वापरला जातो. त्याची सार्थकता काय आहे? यावर विचार व्यक्त करतो.

शहाजीराजे यांच्या पुणे जहागीरदारीचे वतन राखण्याची जबाबदारी तरुण महाराजांवर आल्यावर त्या अंतर्गत प्रजेला शांत आणि सुरक्षित जीवनयापन करायला मिळावे, शेतीच्या मालाची कर आकारणी, वसूली, योग्य दरात व्यापार करून जनतेच्या दैनंदिन गरजा पूर्ण करण्यासाठी, श्रद्धास्थानांना, विद्वानाना, कलावंतांना मान-सन्मान

देणे आणि तत्पर सैन्य शक्तीला शस्त्रे, जनावरे यांचे नियोजन करणे, पूर आणि अवर्षण परिस्थितीत हानी कमी करणे ह्या जबाबदाऱ्या शासक म्हणून त्यांच्यावर आल्या.

त्या काळात ज्या राजकर्त्यांच्या वतीने ही जबाबदारी सनदशीर मिळत असे, त्यांच्या राजकारणातील घडामोडींचा प्रभाव जहागीरदारांवर पडून बदलत्या शत्रू आणि मित्रांवर हत्यारे चालवायची वेळ येत असे. त्यामुळे जनतेला निष्कारण असुरक्षित करावे लागत असे.

आपल्या जहागिरदारीच्या सीमांतर्गत जे गड आणि किल्ले येतात त्याचे नियंत्रण राजसत्तेकडून नेमणूक झालेले किल्लेदार करत असत. त्यांच्या आदेशानुसार जहागीरदारांवर वागण्याचे कडक बंधन असे. लढाई मोहिमांवर सैन्य पाठवायची जबरदस्ती होत असे. युद्धात पराभव किंवा तहातील करारानुसार राजसत्तांची हस्तांतरणे होत तेंव्हा नव्याने पेचाच्या राजकीय परिस्थिती निर्माण होत. जहागिरदाऱ्या, वतने बुडत असत. नवी निर्माण होत असत. नवे सत्ताधारी लोक आपापल्या परीने जनतेवर मनमानी करत. आपापसातले राजकारण करण्यात दंग होत असत.

आमच्या जहागिरदारीच्या सीमांतील किल्लेदाराची नेमणूक बाह्य राजसत्तांकडून झाली नसली पाहिजे. आमची आम्ही ठरवली पाहिजे. ते ठरवण्याचे 'स्वातंत्र्य' आम्हाला असले पाहिजे. ह्या विचारांतून स्वातंत्र्य संकल्पनेचा प्रवाह सुरु केला गेला. तरुण पोराचे काही तरी खूळ आहे. काही काळानी आपल्या आपण संपेल असे आसपासच्या जहागिरदारांना वाटून त्यांनी दुर्लक्ष केले. पण  शिवाजी महाराजांचे निस्पृह न्यायदान, वेतनावर आधारित सैन्य उभारणी यामुळे महाराजांच्याकृतींना, विचारांना काही वरिष्ठ जहागिरीच्या सरदारांचा पाठिंबा आणि मार्गदर्शन मिळू लागले. यातून जहागीरदारांनी बाह्य राजसत्तांच्या राजकारणात आपण यात पडावे किंवा पडू नये, काय करावे किंवा करू नये, आपल्याकडील सैन्य शक्तीने कोणाच्या बाजूने उभे राहावे याचे निर्णय जहागीरदारांकडे असले पाहिजे ही विचारसरणी मान्य झाली.

ही स्वतंत्रतावादी विचारसरणी राज सत्ताधाऱ्यांना कधीच मान्य होणारी नव्हती. मग ते मुगल असोत किंवा इंग्रज असोत.

आपले स्वतःचे किल्लेदार नेमणे यातून ही मोहीम सुरू झाली. अनेक गड- किल्ले, भूभाग आपल्या अंतर्गत विचारसरणीला मानू लागल्यावर जहागीरदारी या सीमित संकल्पनेचे कवच फोडून सार्वभौम राजा म्हणवून घेणे शिवाजी महाराजांना आवश्यक झाले.

त्याची परिणिती शिवाजी महाराजांनी विद्वान प्रतिष्ठित ब्राम्हणांकरवी राज्याभिषेक करून राजा शिवछत्रपती अशी मान्यता मिळवली, शिवराई चलन, सल्लागार प्रधान मंत्री मंडळ, वार्षिक अर्थनियोजन, स्वतंत्र निस्पृह न्यायपद्धती यातून आपल्या संस्कृतीला आधारभूत स्वराज्य निर्मितीची ध्वजा उभारली.

स्वातंत्र्य या संकल्पनेत व्यक्तिगत, सामुहिक, आर्थिक, वैचारिक, धार्मिक स्वतंत्रता देणारी सर्व समावेशक कल्याणकारी समाजरचना हे ध्येय शिवाजी महाराजांच्या कृतीतून दाखवून दिले. यावर आपले विचार जाणून घ्यायला आवडेल.

---

# गनिमीकावा

नमस्कार मित्रांनो,

गनिमीकावा हा शब्द शिवाजी महाराजांच्या युद्धनीतीचे प्रतीक म्हणून मराठी भाषेत रूढ झाला आहे. या शब्द योजनेवर विचार व्यक्त करायचे आहेत.

गनिम म्हणजे शत्रू असा मवाळ अर्थ मानून शत्रूशी मुकाबला करायची शिवाजी महाराजांची युद्धनीती असे मानतात. गनीम [Ganiim• غنيم हा अरबी भाषेत - डाकू, लुटारू म्हणून प्रामुख्याने वापरला जाणारा शब्द आहे. कुराणात गनीम हे एक क्रियापद आहे ज्याचा अर्थ "युद्धात लूट म्हणून घेणे" आहे.] मुस्लिम लोकात कुराणातील कथनानुसार गैरमुस्लिम समाजाला उद्देशून हीन भावना निर्माण करण्याची प्रथा आहे. शिवाजी महाराजांच्या जीवनातील लढायांतून त्यांना लुटारू म्हणून हिणवणे मुसलमानांच्या दृष्टीने स्वाभाविक होते. कावा म्हणजे युक्ती, शक्कल. या दोन शब्दांना

एकत्र करून मराठीत महाराजांची युद्ध कला असे भोंगळपणे म्हटले जाते. ही शब्दयोजना शिवाजी महाराजांच्या कर्तृत्वाला नकळत नकारात्मक प्रभाव निर्माण करते.

याला पर्याय म्हणून Maneuver warfare असे इंग्रजीत जास्त समर्पक नाव देता येईल. (Maneuver डावपेच, युक्ती योजणे) Warfare म्हणजे युद्ध तंत्र. सध्याच्या गनिमीकावा या शब्दातून हीन भावना निर्माण होते.

या शब्दयोजनेचा अर्थ आणि वापर विचारात घेता, युद्धकलेच्या नवीन व्याख्येसाठी मराठीत आणि हिन्दीत **'धूर्त युद्धतंत्र' हा पर्याय अधिक समर्पक आणि सकारात्मक असू शकतो. या शब्दयोजनेमध्ये 'धूर्त' हा शब्द** कुशल, अत्यंत हुशार, सावध, चाणाक्ष, मुत्सुद्दी, कावेबाज, लबाड, बिलंदर, वरचढ




कसे व्हायचे हे पटकन ठरवणारा, समयोचित योग्य कृती करणारा यांचे प्रतीक म्हणून वापरला जाऊ शकतो, जे शिवाजी महाराजांच्या युद्धनीतीशी सुसंगत आहे. त्यांच्या युद्ध प्रसंगातील कुशलता आणि चातुर्य यांचे या शब्दयोजनेद्वारे अधिक योग्यतेने प्रतिबिंबित होऊ शकते. त्यामुळे, गनिमीकावा या शब्दा ऐवजी 'धूर्त युद्धतंत्र' हा पर्याय अधिक उपयुक्त ठरू शकतो, जो शिवाजी महाराजांच्या युद्धनीतीचे सकारात्मक दृष्टीकोनातून वर्णन करतो. या बदलामुळे इतिहासाच्या या महत्त्वपूर्ण पैलूला नवीन आणि अधिक समृद्ध दृष्टीकोन मिळू शकतो. अशा प्रकारे, भाषेच्या विकासासोबतच इतिहासाच्या व्याख्यांमध्ये सुधारणा करणे महत्त्वाचे आहे, जेणेकरून त्या

अधिक समृद्ध आणि समर्पक बनतील. भविष्यातील पिढ्यांना इतिहासाचे अधिक सकारात्मक आणि विस्तृत दृष्टीकोन समजून घेण्यास यामुळे मदत होईल. अशा प्रकारे, भाषा आणि इतिहास यांच्यातील संवाद सतत विकसित होत राहणे आवश्यक आहे.

शिवाजी महाराजांच्या जीवनातील युद्ध प्रसंगातून वरील अर्थछटा चपखल बसतात. म्हणून 'धूर्त युद्धतंत्र' शब्द योजना सुयोग्य आहे.

रुढ गनिमीकावा शब्दाला चालू ठेवण्याऐवजी कालांतराने का होईना सकारात्मक बदल करणे गरजेचे आहे.




या शब्दरचनेवर Copilot AI चा सल्ला घेतला. त्याचे म्हणणे खाली दिले आहे.

**युद्धतंत्र (Yuddhatantra):**

Certainly! I appreciate your thoughtful consideration. Let's explore some Marathi terms that align with the essence of maneuver warfare and Shivaji Maharaj's military tactics:

**युद्धतंत्र** combines two words:**युद्ध (Yuddha):** Refers to **war** or **battle**. **तंत्र (Tantra):** Implies a **system**, **methodology**, or **strategy**.

Together, **युद्धतंत्र** encapsulates the systematic approach to warfare, emphasizing strategy, tactics, and maneuver. This term aligns well with Shivaji Maharaj's innovative and adaptable military methods.

**धूर्त युद्ध तंत्र (Dhurta Yuddha Tantra)**: Shivaji Maharaj's 'Dhurta' tactics often involved such clever maneuvers.

# गुरिला किंवा गुरिल्ला टॅक्टिक्स

गुरिला किंवा गुरिल्ला टॅक्टिक्स या शब्दांना मराठीत गनिमीकावा असे भोंगळपणे नाव दिले जाते. बरेचदा गुरिला शब्द तसाच वापरतात. त्यातून कट, घातपात, अचानक दहशती हल्ले करून पळून जाणे अशा कारवाया अर्थ ध्वनित केला जातो. अशा घातक कृती करून शत्रूवर सैनिकी विजय मिळवणे अपेक्षित नसते. शत्रूच्या योजनात विघ्ने आणणे, गोंधळ उडवून देणे, निरपराधांना ओलीस धरणे अशा समाजविरोधी तंत्रांचा वापर करणे म्हणजे छापेमारीचे गुरिला तंत्र.

शिवाजी महाराजांच्या राज्य कारभार शैलीत आपल्या रयतेला असे त्रास देऊन राज्यकारभार करणे मुळात अमान्य होते. त्यांच्या सैनिकी मोहिमांतील विविध कल्पक डावपेचांना गुरिला तंत्र संबोधून मुंबई, अक्षरधाममंदिर, लोकसभागृहावरील हल्ले, किंवा नक्षली कारवायांच्या हीन स्तरावर उभे करणे  किती योग्य आहे याचा विचार व्हावा.

व्हिएतनाम देशातील लोकांना अमेरिकेविरुद्ध संघर्षात शिवाजी महाराज आदर्श वाटतात.  विदेशातील उच्च मिलिटरी कॉलेजात महाराजांच्या गौरवपूर्ण युद्धनितीचा अभ्यास केला जातो याचे महत्वाचे कारण शिवाजी महाराजांनी दरवेळी वापरलेल्या नवनवीन कल्पक युद्धरचना, खेळ्यांमधून मिळवलेल्या विजयांचे अनेक अंगांनी विश्लेषण करता येते हे आहे.

आता ‘कोपायलट’ नामक कृत्रिम बुद्धिमत्तेकडून काय माहिती मिळते ते पाहू. तिथे अजून मराठी भाषेत समर्पक उत्तरे मिळायला जड जाते. (मी मराठी अजून शिकत आहे, असे म्हटले गेले. असो.)

The word **“guerrilla”** emerged from Spanish language. **It connotes Irregular Forces**: Guerrillas operate in **small units** and often blend into the civilian population. They conduct actions such as **ambushes, sabotage, hit-and-run attacks, and harassment**. In summary, while the term **“guerrilla”** may not fully encompass Shivaji Maharaj’s multifaceted military strategies, it does highlight his adaptability and effectiveness in both conventional and irregular warfare.

वरील संकल्पनांवर विचार व्हावा. काही काळाने का होईना अपेक्षित बदल होतील.






**E Book 53 आणि E Book 54**




उंबरखिंडीतील नाट्य
करतलबखानाचा उतरला नक्षा -
अंबे नळीतील शरणागती - भाग 1.
भीषण कुरवंडे घाटातून कसेबसे मुगल सैन्य उतरले
ड्युक्स नोज म्हणून प्रसिद्ध बाकदार टोक
E Book 53 आणि E Book 54
चिंचोळ्या डोंगराळ जागेतील दैना
Durshet
दुरशेत
तुकसाई
उंच टेकाडावर टेहळणी केंद्र
या इतक्या लहान चिंचोळ्याजागेत 20 हजार सैनिक,10 हजार जनावरे दारुगोळा,वैरण, तंबू धान्य, यासह अडकून पडले. न दिसणाऱ्या शत्रूशी मुकाबला अशक्य होता.
अंबा नदी पात्र
खान
चावनी
जनावरे, सैन्य विश्राम करतात
Sunday, March 26, 2023 E Book 129 - 10 शिवाजी महाराजांच्या लढाया
9










E Book 127




E Book 128

त्याकाळात दमण ते मुंबई पट्टीत पोर्तुगीजांची सत्ता होती, त्याच्याबोटी अशा दिसत...




E Book 129




E Book 130






